**मुख्य अभियंता, जलविज्ञान प्रकल्प, नाशिक या कार्यालयासाठीचा वाहन आढावा मंजूर करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**जलसंपदा विभाग**

**शासन निर्णय क्र: वाहन-१०१०/(प्र.क्र.१४०/१० )/यांत्रिकी**

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.

दिनांक- २२.१२.२०२१

वाचा :

१) शासन निर्णय वित्त विभाग क्र. वाहन १०००/प्र.क्र.६५/२००१/विनियम, दि.१०.९.२००१.

२) मुख्य अभियंता, जलविज्ञान प्रकल्प, नाशिक कार्यालयाचे पत्र क्र.जविप्र/आस्था-२/भां./वाहन/(६७/१०)९०८/२०१०, दि.२६.०४.२०१०.

३) वित्त विभाग अनौपचारिक संदर्भ क्र.४०६/१०/विनियम, दि.२८.०९.२०१०.

**प्रस्तावना :**

वित्त विभागाने त्यांच्या शासन निर्णय दिनांक १० सप्टेंबर, २००१ अन्वये शासकीय व इतर कार्यालयांमध्ये वाहनांच्या वापराबाबत धोरण निश्चित केले आहे. त्यासाठी प्रत्येक प्रशासकीय विभागाने त्यांचेकडील (प्रादेशिक कार्यालयासह) वाहनांचा आढावा घेण्याबाबत निर्देश दिले आहेत. यास अनुसरून जलसंपदा विभागातील मुख्य अभियंता, जलविज्ञान प्रकल्प, नाशिक या कार्यालयाकडे असलेल्या वाहनांचा आढावा मंजूर करणेबाबतचा संदर्भ क्र.२ अन्वये प्राप्त झालेला प्रस्ताव राज्यस्तरीय वाहन आढावा समितीच्या मान्यतेसाठी सादर करण्यात आला होता.

संदर्भ क्र.३ येथील अनौ.संदर्भान्वये वित्त विभागाने मुख्य अभियंता, जलविज्ञान प्रकल्प, नाशिक कार्यालयाच्या अधिपत्याखालील एकूण ३५ कार्यालयांकरिता ३५ वाहनांचा आढावा वाहनांचा आढावा मंजूर केलेला आहे व त्याप्रमाणे शासन निर्णय निर्गमित करणेविषयी वित्त विभागाने निर्देश दिले आहेत. सदर निर्देशास अनुसरुन जलसंपदा विभागाच्या अधिपत्याखालील मुख्य अभियंता, जलविज्ञान प्रकल्प, नाशिक कार्यालयाकरिता मंजूर वाहन आढाव्याचा शासन निर्णय निर्गमित करणे शासनाच्या विचाराधीन होते.

**शासन निर्णय** :

जलसंपदा विभागाच्या अधिपत्याखालील मुख्य अभियंता, जलविज्ञान प्रकल्प, नाशिक कार्यालयाकरिता वाहन आढावा मंजूर करून घेणेबाबतचा प्रस्ताव राज्यस्तरीय वाहन आढावा समितीच्या मान्यतेसाठी सादर करण्यात आला होता. सदर कार्यालयाच्या आस्थापनेवरील पदांची कर्तव्ये व जबाबदा-यांचा विचार करून कोणत्या पदांकरिता वाहन सुविधा उपलब्ध करणे आवश्यक आहे, याबाबत निर्णय घेण्यात आला असून त्यानुसार राज्यस्तरीय वाहन आढावा समितीच्या मान्यतेने वाहन आढावा मंजूर करण्यात येत आहे. वाहन आढाव्याचा कार्यालयनिहाय गोषवारा पुढीलप्रमाणे आहे. तसेच याबाबतचे संक्षिप्त विवरणपत्र सोबतच्या प्रपत्र “अ” प्रमाणे आहे.

## <u>गोषवारा</u>

| अ.क्र. | कार्यालयाचे नाव/पदनाम | एकूण मंजूर वाहने |
|---|---|---|
| १ | मुख्य अभियंता, जलविज्ञान प्रकल्प, नाशिक(१) | १ कार |
| २ | अधीक्षक अभियंता (२) | २ कार |
| ३ | कार्यकारी अभियंता (७) | ५ कार व २ जीप |
| ४ | उपविभागीय अधिकारी/सहायक अभियंता श्रेणी-१/ उपविभागीय अभियंता (२५) | २५ जीप |
| | | **एकूण-३५ वाहने (८ कार + २७ जीप)** |

**वाहन अनुज्ञेयबाबतच्या अटी खालीलप्रमाणे**

१) राज्यस्तरीय वाहन आढावा समितीने वाहन आढावा मंजूर केल्यानंतर त्यात अनुज्ञेय केलेल्या वाहनांच्या संख्येपेक्षा संबंधीत कार्यालयाकडे सद्य:स्थितीत असणा-या वाहनांची संख्या अतिरिक्त ठरत असल्यास या अतिरिक्त वाहनांच्या बदली नवीन वाहने खरेदी करता येणार नाही. सदरची अतिरिक्त वाहने अनुज्ञेय असलेल्या अन्य कार्यालयांकडे त्वरित हस्तांतरित करण्यात यावीत.

२) जुने वाहन निर्लेखित करून नवीन वाहन खरेदीच्या प्रस्तावास वेळोवेळी रितसर वित्त विभागाच्या राज्यस्तरीय वाहन आढावा समितीचे अध्यक्ष यांची मान्यता घेणे आवश्यक राहिल.

३) वित्तीय अधिकार नियम पुस्तिका-१९७८, भाग-पहिला, उपविभाग-दोन, अनुक्रमांक-१९-क, नियम क्र.६९ मधील अटींनुसार वाहन निर्लेखित ठरविण्याची कार्यवाही करण्यात यावी.

२. सदर गोषवारा हा संबंधित कार्यालयाच्या २०१० मधील संरचनेस अनुसरून आहे.

सद्यस्थितीत गोषवारा/प्रपत्र “अ” मधील वाहन अनुज्ञेय असलेल्या कार्यालयांच्या रचनेमध्ये फिरवाफिरवीने बदल झालेला असल्यास त्याअनुषंगाने नवीन कार्यालयांच्या रचनेनुसार संबंधित कार्यालयांनी सुधारित वाहन आढाव्यासाठी वित्त विभाग, शासन निर्णय दिनांक १० सप्टेंबर, २००१ मधील जोडपत्र “अ” नुसार शासनास प्रस्ताव सादर करावा.

३. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र. ४०६/१०/विनियम, दि.२८.०९.२०१० अन्वये वित्त विभागाच्या सहमतीने व मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२११२२२१६२२५०९८२७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साकांक्षित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

MANASI S KATKAR

Digitally signed by MANASI S KATKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WATER RESOURCES DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=dd6fa08503ed40eff74e4c91c3cf375a7676068166ea85e4e9b72b3583073be9, pseudonym=BF980870C851E4712DAE33F099343AD60BDF3C25, serialNumber=1B711C43AADDD0D46D9B6F7448C380D15427E86B7DC1C5717D1E29493730F82B, cn=MANASI S KATKAR
Date: 2021.12.22 16:25:56 +05'30'

**( मानसी काटकर )**

**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. प्रधान सचिव (जलसंपदा विभाग), मंत्रालय, मुंबई-३२.

२. सचिव (लाक्षेवि), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
३. सचिव ( प्रकल्प समन्वय ), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
४. प्रधान सचिव (वित्त), वित्त विभाग तथा अध्यक्ष, राज्यस्तरीय वाहन आढावा समिती.
५. सचिव (प्र.सु.व र.व.का.) सामान्य प्रशासन विभाग तथा सदस्य, राज्यस्तरीय वाहन आढावा समिती.
६. परिवहन आयुक्त, सदस्य सचिव, राज्यस्तरीय वाहन आढावा समिती.
७. सर्व सह सचिव, उप सचिव, अवर सचिव, जलसंपदा विभाग,मंत्रालय,मुंबई-३२
८. मुख्य अभियंता, जलविज्ञान प्रकल्प, नाशिक.
९. वित्त विभाग (कार्या-विनियम), मंत्रालय, मुंबई.
१०. निवड नस्ती-यांत्रिकी.

**वाहन आढाव्यानुसार अनुज्ञेय वाहनांचे संक्षिप्त विवरणपत्र**

**प्रपत्र-"अ"**

| कार्यालयाचे नाव | वाहन अनुज्ञेय आहे असे पदनाम (वाहन संख्या) | आढाव्यानुसार अनुज्ञेय वाहन संख्या |
|---|---|---|
| मुख्य अभियंता, जलविज्ञान प्रकल्प, नाशिक. | १) मुख्य अभियंता- १ कार<br>२) अधीक्षक अभियंता, जलविज्ञान प्रकल्प मंडळ (संकलन), नाशिक- १ कार व त्यांच्या अधिपत्याखालील<br>❖ ५ कार्यकारी अभियंता-५ कार<br>❖ २५ उपविभागीय अधिकारी/सहायक अभियंता श्रेणी-१/ उपविभागीय अभियंता- २५ जीप<br>३) अधीक्षक अभियंता, जलविज्ञान प्रकल्प मंडळ (पृथ:करण), नाशिक- १ कार व त्यांच्या अधिपत्याखालील<br>❖ २ कार्यकारी अभियंता- २ जीप. | ३५ वाहने (८ कार + २७ जीप) |